**रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या रोजगार विषयक सेवांचे विकेंद्रीकरण करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग
शासन निर्णय क्रमांक : रोस्वरो-२०१०/प्र.क्र.२८/रोस्वरो-१
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ५ एप्रिल, २०११.

**प्रस्तावना :-**

नोकरी इच्छूक उमेदवारांना रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रामध्ये त्यांची नाव नोंदणी, नूतनीकरण, शैक्षणिक पात्रता वाढ, नोंदणीचे स्थलांतर व संपर्कात बदल या सर्व सेवा मोफत उपलब्ध आहेत. या सेवा राज्यातील विविध ४६ रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे यामधून दिल्या जातात. यासाठी उमेदवारांना केंद्राच्या ठिकाणी जाऊन नोंदणी करणे अथवा फिरते पथकासमोर तालुक्याच्या ठिकाणी प्रत्यक्ष उपस्थित राहून सेवा घ्यावी लागते.

रोजगार व स्वयंरोजगार कार्यालयांमार्फत उमेदवार व उद्योजक यांना दिल्या जाणाऱ्या सेवा अधिक तत्पर, पारदर्शक व एकात्मिक संगणकीय पद्धतीने व अद्यावत माहिती तंत्रज्ञानाच्या माध्यमातून सहजतेने मोठ्या प्रमाणावर ग्रामीणस्तरापर्यंत पोहचवून पात्र, कौशल्यधारक व गरजू उमेदवारांचा डाटाबेस तयार करुन उद्योजकांना मागणीप्रमाणे चांगले मनुष्यबळ उपलब्ध करणे आणि नोंदणीपटावरील उमेदवारांना रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या रोजगार विषयक सेवांचे विकेंद्रीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. दिनांक २३/०२/२०११ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या रोजगार विषयक सेवांचे विकेंद्रीकरण करण्यास मान्यता देण्यात आली.

**शासन निर्णय :-**

रोजगार व स्वयंरोजगार कार्यालयांमार्फत दिल्या जाणाऱ्या सेवा अधिक तत्पर, पारदर्शक व एकात्मिक संगणकीय पद्धतीने अद्यावत माहिती तंत्रज्ञानाच्या माध्यमातून देण्यासाठी आणि शासनाच्या सेवा जास्तीत जास्त उमेदवार व उद्योजक/नियोक्ते यांचेपर्यंत अधिक सुलभतेने पोहचविण्याची आवश्यकता लक्षात घेऊन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या सेवांचे विकेंद्रीकरण करणे या योजनेची अंमलबजावणी खालील प्रकारच्या माध्यमाद्वारे करण्यात यावी :-

**(१) महा-ई-सेवा केंद्रे (कॉमन सर्व्हिस सेंटर-csc) :-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मातंसं/ प्रक्र२८-३९, दिनांक ३ डिसेंबर, २००८ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार उभारण्यात येणाऱ्या ११,७५६ कॉमन सर्व्हिस सेंटर्सचा यात समावेश आहे.

(२) **शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्था (I.T.I.), तंत्रनिकेतन महाविद्यालये (Polytechnic Colleges), अभियांत्रिकी महाविद्यालये (Engineering Colleges) इत्यादी** :- राज्यातील शासनमान्य ४१६ औद्योगिक प्रशिक्षण संस्था (ITI's), तंत्रशिक्षण देणारी १,०३४ तंत्रनिकेतन पदविका महाविद्यालये (Ploytechnic Colleges) तसेच, अभियांत्रिकी, फार्मसी, हॉटेल मॅनेजमेंट व आर्किटेक्ट या विविध क्षेत्रातील तंत्रशिक्षण देणारी शासनमान्य ४६१ महाविद्यालये इत्यादीचा यात समावेश आहे.

२. रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या उमेदवार व उद्योजक/नियोक्ते यांना द्यावयाच्या सेवा सुविधा ह्या दोन टप्प्यात देण्यात याव्यात. पहिल्या टप्प्यात सध्याच्या वेबपोर्टलमध्ये कोणतेही बदल न करता सर्व सेवा सुविधा देण्याची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी. दुसऱ्या टप्प्यात राज्यातील सर्व कार्यालयांचा नोंदणीपट डाटा स्वतंत्रपणे एकाच सेंट्रल सर्व्हर आणून रेव्हेन्यु मॉड्युलसह प्रत्येक महा-ई-सेवा केंद्रांना (CSC) व युझर्स यांना लॉगइनची सुविधा उपलब्ध करुन द्यावी व तात्काळ नोंदणीचे ओळखपत्र महा-ई-सेवा केंद्रातूनच द्यावे.

३. महा-ई-सेवा केंद्रे (CSC), औद्योगिक प्रशिक्षण संस्था, तंत्रशिक्षण व अभियांत्रिकी महाविद्यालये यांचेमार्फत रोजगार विषयक सेवांचे कामकाज करताना सदरील केंद्रे उमेदवारांच्या कागदपत्रांची पडताळणी विभागाच्या प्रचलित पद्धतीने करतील. यासाठी सदर केंद्रातील कर्मचाऱ्यांना आवश्यक ते प्रशिक्षण व मार्गदर्शक माहिती आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांनी द्यावी.

४. सेवा सुविधेच्या प्रकाराप्रमाणे उमेदवार, उद्योजक/नियोक्ते यांना आकारावयाचे दर खालीलप्रमाणे राहील :-

| **सेवा सुविधा प्रकार** | **प्रती उमेदवार, उद्योजक/नियोक्ते यांना आकारावयाचे सेवा सुविधा शुल्क** |
|---|---|
| **उमेदवारांकरीताच्या सेवा** | |
| (१) वेबसाईटवरुन उमेदवारांची नाव नोंदणी करून तात्पुरत्या स्वरुपातील नोंदणी प्रमाणपत्र तयार करुन उमेदवारास देणे . | पहिला टप्पा :- रु.२०/- + रु.५ पोस्टेज चार्जस्<br>दुसरा टप्पा :- रु.२०/- |
| (२) उमेदवारांची शैक्षणिक पात्रता, अनुभव, संपर्क व पत्ता बदल इ. अद्यावतीकरण करून पावती देणे. | पहिला टप्पा :- रु.१५/- + रु.५ पोस्टेज चार्जस्<br>दुसरा टप्पा :- रु.१५/- |
| (३) (अ) उमेदवारांच्या नोंदणीचे नूतनीकरण करून नूतनीकरण पावती तयार करुन उमेदवारास देणे<br>(ब) फक्त नाव नोंदणी दुय्यम ओळखपत्र क्ष-१० देणे<br>(क) फक्त संपर्क व पत्ता बदलून पावती देणे. | पहिला टप्पा :- रु.१०/- + रु.५ पोस्टेज चार्जस्<br>दुसरा टप्पा :- रु.१०/- |

| सेवा सुविधा प्रकार | प्रती उमेदवार, उद्योजक/नियोक्ते यांना आकारावयाचे सेवा सुविधा शुल्क |
|---|---|
| **उद्योजक/नियोक्ते यांचेकरीता सेवा** | |
| (१) (अ) नविन आस्थापनेची नोंदणी करणे<br>(ब) ईआर-१ विवरणपत्रे सादर करणे | रु.२०/- |
| (२) ईआर-२ विवरणपत्रे सादर करणे | रु.५०/- |

या योजनेद्वारे उमेदवारांना सर्व सुविधा त्यांच्या राहत्या ठिकाणाच्या जवळ किंवा गावात पुरविली जाणार आहे. त्यामुळे, सेवा सुविधा केंद्राचा खर्च भागविण्यासाठी सदर सेवा सःशुल्क उपलब्ध करुन देण्यात येत आहे. मात्र, सदर सःशुल्क सेवांचा लाभ घेणे बंधनकारक नाही. उमेदवार प्रत्यक्ष रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रात जाऊन निःशुल्क प्राप्त करुन घेऊ शकतात.

५. सेवा सुविधा दर आकारणीमुळे मिळणाऱ्या शुल्काची वाटणी खालीलप्रमाणे करण्यात यावी :-

**अ) शासकीय यंत्रणेमार्फत होणारे कामकाज**

| अ. क्र. | संस्था | सेवा सुविधा शुल्काची विभागणी (टक्केवारीत) |
|---|---|---|
| १ | स्टेट डेसिग्नेटेड एजन्सी (SDA) (राज्य सेतू संस्था, माहिती तंत्रज्ञान) | १०% |
| | सेवा केंद्र एजन्सी (SCA) व शहरी /ग्रामीण भागातील महा-ई-सेवा केंद्रे (CSC) | ८०% |
| | रोजगार व स्वयंरोजगार विभाग | १०% + टपाल खर्च |

**ब) शासनमान्य यंत्रणेमार्फत होणारे कामकाज**

| | | |
|---|---|---|
| २ | शासनमान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्था (I.T.I.), तंत्रनिकेतन महाविद्यालये (Polytechnic Colleges), अभियांत्रिकी महाविद्यालये (Engineering Colleges) इ. | ९०% |
| | रोजगार व स्वयंरोजगार विभाग | १०% + टपाल खर्च |

६. सेवा सुविधा शुल्क आकारणीतून विभागाला मिळणाऱ्या वाटणीचा (१० टक्के) उपयोग रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेच्या आज्ञावली विकसन व देखभाल कामाकरिता खर्ची टाकण्यात यावा. याबाबत आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास यांच्या स्तरावर सविस्तर व्यवस्थापन पद्धती स्वतंत्रपणे ठरविण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४०५१७२४४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(वि.रा.शिरसाट)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.विधानसभा/मा.विधान परिषद सदस्य,
मुख्य सचिव यांचे सचिव,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, नवी मुंबई,
उपसचिव (रोस्वरो-१/रोस्वरो-२), रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
अवर सचिव, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
सर्व कार्यासन अधिकारी, रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विभागप्रमुख (संबंधित विभागामार्फत),
सर्व शासन मान्य औद्योगिक प्रशिक्षण संस्था/तंत्रनिकेतन पदविका महाविद्यालये/अभियांत्रिकी महाविद्यालये/फार्मसी/हॉटेल मॅनेजमेंट/आर्किटेक्ट महाविद्यालये,
शासकीय/निमशासकीय संस्था/मंडळे/महामंडळे/विद्यापीठे, शैक्षणिक प्रशिक्षण संस्था (संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत),
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महापालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व उप संचालक, रोस्वरो/सहायक संचालक, रोस्वरो/रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, रोस्वरो,
निवड नस्ती (रोस्वरो-१).